2010100414595700१

**नांदेड जिल्हयातील माहुर ग्रामपंचायतीला नगरपंचायतीचा दर्जा देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**शासन निर्णय** क्र.एमयुएम १११०/प्र.क्र.१५९/नवि-१७
दिनांक: १३/९/ २०१०

**प्रस्तावना:-** नांदेड जिल्हयातील माहूर ग्रामपंचायतीला नगरपंचायतीचा दर्जा देण्याबाबत शासनाचा इरादा जाहिर करण्याबाबतची सोबतची उदघोषणा महाराष्ट्र शासन राजपत्र भाग एक - अ औरंगाबाद विभाग यामध्ये मराठी व इंग्रजी या क्रमाने प्रसिध्द करण्यात यावी.

०२ महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ च्या कलम ३ च्या उपकलम (३) च्या तरतूदीनुसार आवश्यक असल्याप्रमाणे सदर उदघोषणा महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिध्द झाल्यानंतर जिल्हाधिकारी नांदेड यांनी ती उद्घोषणा तात्काळ किमान एका स्थानिक वृत्तपत्रात प्रसिध्द करावी, तसेच माहूर ग्रामपंचायत महसूल क्षेत्रातही प्रमुख ठिकाणी उदघोषणेच्या मराठी प्रती चिकटविण्याबाबत कार्यवाही करावी. ज्या प्रमुख ठिकाणी हया उदघोषणेच्या मराठी प्रती चिकटविण्यात येतील अशी ठिकाणे व त्यांचे दिनांक देखील जिल्हाधिकारी, नांदेड यांनी शासनास कळवावेत.

०३, सदर उदघोषणा शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकानंतर तीस दिवसांच्या आत जिल्हाधिकारी, नांदेड यांच्याकडे उपर्निदेष्टित अधिनियमाच्या कलम ३ च्या उपकलम (४) च्या तरतूदीनुसार प्राप्त झालेल्या हरकती/सूचना, त्यावरील त्यांच्या अभिप्रायासह व हया उदघोषणेनुसार माहूर ग्रामपंचायतीला नगरपंचायतीचा दर्जा देण्याबाबतच्या अधिसूचनेच्या अंतिम मसुद्यासह त्यांनी शासनाकडे सादर कराव्यात.

०४, शासन निर्णयाच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आंत नांदेड जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांनी हा प्रस्ताव जिल्हा परिषद, जिल्हा परिषदेची स्थायी समिती व मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ च्या कलम ४ (२) च्या तरतूदीनुसार संबधित ग्रामपंचायतीपुढे ठेवून त्यांचे काही अभिप्राय असल्यास, जिल्हाधिकारी नांदेड यांच्याकडे पाठवावेत व त्याची एक आगाऊ प्रत शासनाकडे सादर करावी. जर या कालावधीत अभिप्राय प्राप्त झाले नाहीत तर त्यांचे कांही अभिप्राय नाहीत असे समजण्यात येईल.

०५ व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, औरंगाबाद यांनी सोबतची उदघोषणा मराठी व इंग्रजीतून प्रसिध्द करावी उदघोषणेच्या पुरेशा प्रती छापाव्यात व त्यांच्या प्रत्येकी ५० प्रती जिल्हाधिकारी नांदेड, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड व या विभागाकडे तसेच ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय यांच्याकडे त्वरीत पाठवाव्यात.

कृ.मा.प.

D:\Tippani\Notifications

०६,     सह संचालक, माहिती व जनसंपर्क , मुंबई यांनी याबाबत योग्य असे प्रसिध्दी पत्रक काढावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अ.बा.घरत )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
प्रादेशिक संचालक, नगरपालिका प्रशासन, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
जिल्हाधिकारी, नांदेड
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड
संचालक, नगररचना व मुल्यनिर्धारण, पुणे.
उपसंचालक, नगररचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, औरंगाबाद
( सोबतची अधिसूचना शासनाच्या असाधारण राजपत्राच्या भाग एक-अ औरंगाबाद विभाग पुरवणीमध्ये प्रसिध्द करण्याच्या व ५० प्रती सर्व संबंधीतांना पाठविण्याच्या विनंतीसह )
संचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई ( योग्य अशी प्रेस नोट काढण्यासाठी )
महासंचालक, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था, सी.डी. बर्फीवाला मार्ग, अंधेरी (प) मुंबई
तहसिलदार, माहूर, जि. नांदेड
सरपंच, ग्रामपंचायत माहूर, जि. नांदेड
कक्ष अधिकारी/नवि-२९ याना शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यासाठी
निवडनस्ती ( नवि-१७)

D:\Tippani\Notifications

## अधिसूचना

नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक १३/९/ २०१०

क्रमांक : एमयूएम-१११०/प्रक्र-१५९/नवि-१७:

महाराष्ट्र नगरपरिषदा नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५

ज्याअर्थी, यासोबत जोडलेल्या अनुसूची 'अ' मध्ये अधिक विशेषत्वाने वर्णन केलेले नांदेड जिल्हयातील माहूर हे महसुली गाव माहूर तालुक्याचे "तालुका मुख्यालय क्षेत्र" व प्रसिद्ध तिर्थक्षेत्र (यात यापुढे ज्याचा "उक्त स्थानिक क्षेत्र" असा निर्देश करण्यात आला आहे) आहे;

आणि ज्याअर्थी, भारतीय संविधान अनुछेद २४३ क्यू च्या खंड (२) मध्ये नमूद केलेल्या बाबी लक्षात घेता, उक्त स्थानिक क्षेत्र हे ग्रामीण क्षेत्रातून नागरी क्षेत्रात संक्रमित होणारे क्षेत्र असल्याने, त्यास संक्रमणात्मक क्षेत्र म्हणून विनिर्दिष्ट करणे इष्ट आहे असे महाराष्ट्र शासनास वाटते;

ज्याअर्थी, आता, महाराष्ट्र नगर परिषदा, नगर पंचायती व औद्योगीक नगरी अधिनियम, १९६५ (१९६५ चा महाराष्ट्र अधिनियमाच्या चाळीस) याच्या कलम ३४१-अ, सह कलम ३ च्या पोट-कलम (३) च्या तरतुदींनुसार, महाराष्ट्र शासन, याद्वारे उक्त अधिनियमाच्या ३४१-अ च्या पोट-कलम (१) आणि (१-अ) अन्वये अधिसूचना काढण्याचा त्यांचा असा उद्देश घोषित करते की, उक्त स्थानिक क्षेत्र हे ग्रामीण क्षेत्रातून नागरी क्षेत्रात संक्रमित होणारे यासोबत जोडलेल्या अनुसूची 'ब' मध्ये उल्लेखिलेल्या सीमा असलेले क्षेत्र असल्याने, ते संक्रमणात्मक क्षेत्र म्हणून विनिर्दिष्ट करण्यात येईल आणि त्यासाठी माहूर नगर पंचायत या नावाने नगर पंचायत घटित करण्यात येईल.

उक्त प्रस्तावावर आक्षेप असणाऱ्या सर्व व्यक्तींनी ते ही उद्घोषणा महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिद्ध झाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या कालावधीत, त्यासंबंधीच्या कारणासह जिल्हाधिकारी नांदेड यांच्याकडे लेखी सादर करणे याद्वारे आवश्यक करण्यात येत आहे.

D:\Tippani\Notifications

## अनुसूची "अ"

संक्रमणात्मक क्षेत्र म्हणून विनिर्दिष्ट करावयाच्या स्थानिक क्षेत्राचे वर्णन

माहूर या महसुली गावाचे गट नंबर १ ते १९९

## अनुसूची "ब"

अनुसूची अ मध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे संक्रमणात्मक क्षेत्र संक्रमणात्मक क्षेत्र म्हणून घोषित करावयाच्या प्रस्तावित स्थानिक क्षेत्राच्या सीमा

उत्तर: मौजे शेकापूर शीव, लांगी शिव, खम्मापूर शिव, पापलवाडी शिव,

पूर्व: मौजे मेट शिव

दक्षिण: मौजे बाजरा शिव, दत्त मांजरी शिव

पश्चिम: मौजे कोराडी शिव, गुंडवाल शिव

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( अ.बा.घरत )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

टीप: प्रस्तावीत नगर पंचायतीचे क्षेत्र दर्शविणारा आराखडा जनतेच्या निरीक्षणासाठी जिल्हाधिकारी, नांदेड, तहसिलदार माहूर, व माहूर ग्रामपंचायत यांच्या कार्यालयात कार्यालयीन कामकाजाच्या वेळेत उपलब्ध आहे.

D:\Tippani\Notifications

Maharashtra Municipal Councils, Nagar Panchayats and Industrial Townships Act, 1965

**URBAN DEVELOPMENT DEPARTMENT**
**Mantralaya, Mumbai-400 032**
**Dated 13/9/ 2010**

## PROCLAIMATION

**NO. MUM-1110/CR 159/UD-17**

Whereas, the local area of the village of Mahur in Nanded District, more particularly described in Schedule "A" appended hereto (hereinafter referred to as "the said local area") is Taluka Headquarter of Mahur Taluka and a religious place;

And whereas, having regard to the factors mentioned in clause (2) of Article 243-Q of the Constitution of India, the Government of Maharashtra considers it expedient to specify the said local area to be a transitional area , being an area in transition from rural area to urban area;

Now, therefore, in pursuance of the provisions of Section 341-A read with sub-section (3) of section 3 of the Maharashtra Municipal Councils, Nagar Panchayats and Industrial Townships Act, 1965 (Mah. XL of 1965) the Government of Maharashtra hereby announces its intention to issue a notification under sub-section (1) and (1-A) of section 341-A of the said Act, that the said local area shall be specified as a transitional area being an area in transition from rural area to urban area, having the boundaries mentioned in schedule "B" appended hereto and for which, there shall be constituted a Nagar Pachayat by the name of "Mahur Nagar Panchayat".

2. All persons who entertain any objection to the said proposal are hereby required to submit the same with reasons therefor, in writing, to the Collector, Nanded, within a period of thirty days from the date of publication of this proclamation in the Maharashtra Government Gazette.

D:\Tippani\Notifications

## SCHEDULE 'A'

**The description of the local area to be specified as a transitional area**

All survey nos. along with gaothan area of Revenue Village Mahur from Gat No. 1 to Gat No. 199

## SCHEDULE 'B'

Boundries of the local area Proposed to be declared as transitional Area Specified in Schedule 'A'

North : Mouje Shekapur shiv, Langi Shiv, Khamapur Shiv, Papalwadi Shiv

East : Mouje Met Shiv

South : Mouje Bazara Shiv, Datt Majari Shiv

West : Mouje korodi Shiv, Gundwal Shiv

By order and in the name of the Governor of Maharashtra

(A.B.Gharat)

Deputy Secretary to Government

Note:-- A plan showing the area of the proposed Mahur Nagar Panchayat is available for public inspection in the office working hours, in the office of the Collector of Nanded, the Tahsildar, Mahur and the Mahur Grampanchayat

D:\Tippani\Notifications